# अनुक्रमणिका

# संपादकीय

अबुधाबी महाराष्ट्र मंडळ मराठी माणसाला एकत्र आणण्याचे काम करत असले तरी  त्यांना जोडण्याचे काम माय मराठी भाषा करत आहे यात तिळमात्र शंका नाही आणि हा धागा आपले मराठी मासिक म्हणजे 'बहर'.

आज संपादकीय लिहीताना खुप आनंद होत आहे. खरतर मी जेव्हा अबुधाबी मधे आले तेव्हा खुप काही मोठी स्वप्न नव्हती पण जसा  मंडळाशी संबध येत गेला तसे  खुप काही करावेसे वाटत होते पण काही करु शकले नाही पण आज मंडळाची  कार्यकारी सभासद झाल्यावर खुप  आनंद होत आहे. कधी स्वप्नातही वाटलं नव्हत की कधी आपण बहर चे काम करू आणि त्या मधे कधी संपादकीय लिहू..हया महिन्याचा बहर तुमच्या साठी सादर करताना खुप प्रश्न पडले पण नंतर विचार केला की अरे आपण का घाबरतोय ? आपण तर आपल्याच लोकांसाठी मनापासुन काही तरी लिहीतोय आणि आपण आपले मराठी पण , मराठी साहित्य बद्दलची आवड याचे नेहमीच कौतुक  केले जाते. मागील वर्षीच्या बहर टिमने  खुप मेहनत घेतली आणि बहर ला खुप बहारदार केले तर आम्ही नेहमी  हा प्रामाणिक  प्रयत्न करू की तुम्हा सर्वांना बहर  वाचताना आनंद होईल आणि त्याच बरोबर तुमच मन तुम्हालाही काही तरी बहरसाठी लिहिण्यासाठी भाग पाडेल.

.

म्हणुन या बहर च्या निम्मीताने मी तुम्हा सर्वाना विनंती करते की तुम्ही तुमच्या विचारांना चालना दया आणि आम्हाला पाठवुन दया तुमचे लेख,कथा,कविता,शब्दकोडी,त्याचबरोबर बालविश्वा मध्ये त्यांचे कलागुण.

.

मग विचार कसला करताय उचला पेन आणि लिहा तुमचे अविस्मरणीय अनुभव,आम्ही आशा करतो की तुमचे लेख,कविता,कलाकारी,हास्यकविता आमच्या पर्यत २२ जुन पर्यत मिळेल

. maharasthramandalad@gmail.com

**सौ.कोमल तावडे.**

सौ. राधीका लपालीकर

श्री.निहाल मांडके

(बहर टिम २०१४ –१५)

# वटपौर्णिमा महती

जेष्ठ पौर्णिमा हा दिवस "वटपौर्णिमा" म्हणून साजरा केला जातो. हे व्रत सुवासिनी अपल्या पतिला उत्तम आरोग्य लाभावे, दीर्घायुष्य प्राप्त व्हावे म्हणून करतात.

वटपौर्णिमेच्या दिवशी सुवासिनी महिला वटवृक्षाची पूजा करतात. हळदकुंकू हे सौभाग्याच प्रतिक आणि सौभाग्यवतीचे फणी करंडा, काळी पोत, हिरव्या बांगड्या हे सौभाग्य अलंकार तिथे अर्पण करतात. वडाला पाच प्रदक्षिणा मारून सूत गुंडाळतात. मनोभावे वटवृक्ष राजाचे पुजन करतात. ह्या व्रताशी संबंधीत अशा सावित्रींचे स्मरण पूजन करतात. सावित्री हिने आपला पति सत्यवान ह्याचे प्राण यमाकडून कसे परत मिळवले. ह्या बद्दल एक पौराणिक कथा सांगितली जाते ती अशी.

सावित्री ही भद्र देशाचा राजा अश्वपती ह्याची कन्या. आपल्या सत्वगुणी समंजस, गुणवान, रूपवान, धैर्यवान आणि सुशील कन्येबद्दल राजाराणीला मोठा आभिमान होता.

खरं तर अशा ह्या सुंदर राजकन्येला कुणीही एखादा राजकुमार सहज पती म्हणून मिळाला असता पण तसं घडलं नाही तिनं निवड केली ती जंगलात राहणाऱ्या सदाचारणी, सत्यवचनी, सामर्थवान आणि आपले नांव सार्थ करणाऱ्या सत्यवानाची.सत्यवान हा अल्पायुषी होता. लग्नानंतर तो एक वर्षातच मृत्यू पावेल हे भाकित ठाऊक असून ही सावित्रीनं त्याच्याशीच विवाह केला.

सावित्री सत्यवानाच्या झोपडीत आनंदात राहू लागली. सासू सासऱ्याची सेवा करू लागली. पतीसेवा करू लागली. पतीला त्याच्या कामांत मदत करू लागली.होता होता एक वर्षाचा काळ होत आला.. आणि तो दिवस उगवला. पहाटे पासूनच सावित्रीला अपशकुन होऊ लागले. तिनं एक वेगळाच निश्चय केला. त्या दिवशी ती मुद्दाम पती बरोबर जंगलांत लाकडं तोडण्यासाठी गेली.

झाडावर चढून सत्यवान लाकडं तोडून खाली टकत होता आणि सावित्री ती लाकडं गोळा करत होती.. आणि एकाएकी घेरी येऊन सत्यवान झाडावरून खाली पडला.

सावित्रीनं त्याला एका वृक्षाखाली नेलं व त्या वृक्षाच्या सावलीत ती त्याला सावध करण्याचा प्रयत्न करू लागली. तेवढ्यात तिथं यमराजाची स्वारी आली आणि सत्यवानाचे प्राण हरण करून घेऊन जाऊ लागली.

तशी सावित्री ही यमराजांचे मागे धावत जाऊ लागली. आपल्या पतीचे प्राण परत मागू लागली. बाळ! मृत्यूच्या मार्गावरचा प्रत्येक जीव हा एकटा असतो. त्याचा कुणी सोबती नसतो. तू परत जा.. यमराज म्हणाले.तेव्हा पतीवाचून पत्नीने जगावे का? तिच्या जगण्याला काही अर्थ राहतो का? सहगमन हा पत्नीचा धर्म आहे असं शास्त्रच सांगते नां? अशी अनेक प्रश्नोत्तरे करून सावित्रीने अखेर यमराजाचे मन जिंकले.

तिचा निश्चय, धैर्य, धर्म शास्त्राच ज्ञान, तिच बुद्धी कौशल्य, चतुराई हे सारं पाहून यमराज प्रसन्न होऊन म्हणाले,"सावित्री, एक लक्षांत ठेव. केवळ पतीचे प्राण सोडून हवे ते माग, मी ते देईन. बोल काय हवे तुला".मग सावित्रीने चतुराईन यमाकडे सासऱ्याचं गेलेल राज्य मागितले. यम हो म्हणाले, सासू सासऱ्यांना दृष्टी मागितली, यमराजाने ती दिली. असं एकएक मागतामागता सावित्रीने पुत्र मागितला. यमराज इतर मागण्यांप्रमाणे हो म्हणाले आणि..दिल्या शब्दाप्रमाणे पुत्रप्राप्तीसाठी यमराजांना सत्यवानाचे प्राण परत द्यावे लागले.

ही पौराणिक कथा खरंच श्रवणीय आणि बरंच काही शिकवून जाणारी आहे. त्या कथेच स्मरण वटवृक्षाचे पूजन आणि सौभाग्य वरदान मागण्याचा हा दिवस.

# संस्कृत सुभाषित

या महिन्याच्या सुभाषितात आपण महत्वाचा संदेश घेऊया.

**माता मित्रं पिता चेति स्वभावात् त्रतयं हितम् ।**
**कार्यकारणतश्चान्ये भवन्ति हितबुद्धय: ॥**

विवेचन –

सुभाषितकाराचे असे म्हणणे आहे की आपल्या सभोवती असणाऱ्यांमधे फक्त तीनच नाती नि:स्वार्थपणे आपल्या हितासाठी धडपडतात. ती तीन नाती म्हणजे आई, वडील आणि मित्र! याबाहेरची कोणी व्यक्ती स्वत:चा स्वार्थ किंवा हित असल्याशिवाय मदतीला येत नाहीत.

**शब्दार्थ –**

त्रतयं = ते तिघे

तश्चान्ते = त्यानंतर

भवन्ति = होणे, असणे

हितबुद्धय: = काही हेतू मनात ठेवून

श्री. नरेन्द्र कुलकर्णी

# सुविचार

" जेव्हा तुम्ही विचार करता की, मी विजयी होणार नाही तेव्हा तुम्ही विजयी होत नाही. पण जेव्हा तुम्ही मी विजयी होणार असा विचार करता तेव्हा तुम्ही विजयी होता."

## स्पष्टीकरण

आत्मविश्वास हे कर्तुत्त्ववृक्षाचे मुळ आहे.वृक्षाची मुळे जो जो भूमीत खोलवर जातात. तो तो ती वादळाशी झुंजण्याचे त्यांचे सामर्थ्य वाढते.आयुष्यातील नानाविध संकटाशी टक्कर देण्याला आत्मविश्वासही असाच कारणीभूत असतो. आणि असा हा आत्मविश्वास निर्माण होण्यासाठी सकारात्मक विचारांचा आवश्यकता असते. आपण ज्याप्रमाणे विचार करतो त्याप्रमाणे आपल्याकडुन कृती घडत असते. सकारात्मक विचारांमुळे माणुस यशाच्या पायऱ्या चढण्यात यशस्वी होतो . परंतु नकारात्मक विचारांमुळे माणूस यशाच्या पायऱ्या चढण्यात अयशस्वी होतो.

## उदाहरण

आपल्याला जेव्हा वाटतं, की जग खुप सुंदर आहे, तेव्हा जग खरोखरच सुंदर असतं. आपल्याला जेव्हा वाटतं ,की जगात प्रेम आहे तेव्हा आपणाला खरोखरच प्रेम लाभतं. आपल्याला जेव्हा वाटतं, की प्रेमात सुख आहे तेव्हा आपण जगातली सुखी व्यक्ती असता. परंतु जेव्हा तुमच्या हातून एखादी संधी निसटते तेव्हा तुम्ही निराश होऊनका.नकारात्मक विचार अजिबात करू नका. कारण

एक संधी निसटली असं जेव्हा वाटत, तेव्हा दुसरी संधी वट पाहत उभी असते. फक्त तिला शोधण्याकरिता आपली दृष्टी सजग हवी. आपला विश्वास हवा परमेश्वरावर आणि सर्वांत महत्वाचे म्हणजे स्वतःवर त्यासाठीएक संधी निसटली म्हणून डोळे अश्रूंनी भरून देऊ नका. आपली दृष्टी साफ ठेवा, म्हणजे पेढील संधी दिसेल व ती हुकणार नाही. नियती प्रत्येकाला काही ना काही देते पण ते समजण्यासाठी आयुष्याकश्डे पाहण्याचा दृष्टीकोन सकारात्मक हवा आणि वृत्ती आनंदि हवा.

## तात्पर्य

थोडक्यात काय तर प्रत्येक सुखाचा उगम आपल्या विचारात पर्यायाने आपल्याला मनात होतो. त्यांना नेहमी सुंदर व आशावादी ठेवा. त्याच प्रमाणे आपल्या विचारांत आपल्या भविष्याचं प्रतिबिंब पडलेलं असतं. त्यांना नेहमी सुंदर आणि उज्ज्वल असु द्या.

**संग्रहित ... सौ.कोमल तावडे**

# ऐसी कळवळ्याची जाती

लेखक: प्रा. मिलिंद जोशी

प्रकाशक: कॉन्टिनेन्टल २०१२

पाने : २१०

ऐसी कळवळ्याची जाती हे पुस्तक म्हणजे १७ व्यक्तीचित्रांच संकलन आहे. पहिल्या ३ व्यक्तीरेखा हे त्यांचे जिव्हाळ्याचे नातेवाईक आहेत.आई वडील आणि आजी. लेखकाचे आयुष्य घडवण्यामध्ये या व्यक्तींचा मोलाचा वाटा आहे. असे वाटते की या व्यक्तींच्या साहित्यीक योगदानापेक्षा त्यांच्यावरील प्रेमापोटी त्यांचा या पुस्तकात अंतर्भाव झाला आहे.

त्या नंतरची १४ व्यक्तीचित्रे ही मराठी साहित्य वर्तुळातील प्रसिध्द आणि पूजनीय व्यक्तीमत्व आहेत. मी प्राचार्य शिवाजीराव भोसल्यांना लहानपणापासून पाहिलं आहे पण या पुस्तकातुन मला त्यांच्या बद्दल बरीच नवीन माहीती समजली. सुज्ञ वाचकांना माहीती असेलच की मिलिंद जोशींनी प्राचार्य या नावाने शिवाजीराव भोसल्यांचे चरित्र लिहिले आहे. मिलिंद आपल्याला सांगतात की मृत्युंजयकार शिवाजी सावंत जरी बेरे (सैनिकी टोपी) घालायचे तरी ते कधी सैन्यात नव्हते. मृत्युंजय ही कादंबरी मराठीतील सर्वाधिक खपाचे पुस्तक आहे. मृत्युंजय नोबेल साठी नामांकित झाले होते. शिवाजी सावंतांना मृत्युंजयकार हे संबोधन आचार्य अत्रे यांनी दिले.

प्रा. राम शेवळकर हे साहित्यातील नंदादीप होते.गं.ना.जोगळेकर हे स्पष्टवक्ते होते. प्रसंगी वाईटपणा घेऊन त्यांनी महाराष्ट्र साहित्य परीषदेचे काम मनोभावे केले. निर्मलकुमार फडकुले यांचे वर्णन ते रसाळ वाणीचा असे करतात. द.मा. मिरासदारांना ते निर्मळ मनाचा भावनाप्रधान माणुस म्हणतात. डॉ. द. भि. कुलकर्णी यांचे वर्णन महाराष्ट्रातील सर्वोत्तम समिक्षकांपैकी एक असे करतात. कवी ग्रेस हे माणुसघाणे नव्हते. त्यांची कविता गूढ असली तरी त्यांची रहाणी अत्यंत साधी होती.

भारती विद्यापीठाचे कुलगुरू शिवाजीराव कदम यांच्या बद्दल लिहिताना लहान भावाचे मोठया भावावरील प्रेम दिसते. पोलीस कथाकार आणि संपादक व. कृ. जोशी यांना विरळ असा स्वच्छ पोलीस आधिकारी म्हणतात. लहानपण राजस्थानमध्ये गेल्यानंतर लग्न होऊन पुण्याला आल्यावर मराठी शिकुन साहित्यीक आणि आकाशवाणीवर निर्माता बनलेल्या ज्योत्सना देवधर यांच्या बद्दल भरभरून लिहितात. आहे मनोहर तरी या पुस्तकामुळे वादाच्या भोवऱ्यात सापडलेल्या पू.ल.देशपांडे यांच्या पत्नी सुनीता देशपांडे यांचे जोरदार समर्थन करतात आणि शेवटी कवी दत्ता हलसगीकरांच्या आशयघन कवितेबद्दल लिहितात.

मिलिंद जोशींचा प्रसिद्वीचा बुरखा भेदुन त्या मागचा माणुस दाखवण्याचा प्रयत्न यशस्वी झाला आहे. या प्रसिद्व व्यक्तीच्या बाबतीतल्या सामान्यांना माहिती नसलेल्या गोष्टी वाचायला आवडते पण जोशींचे लिखाण थोडे विस्कळीत वाटते. मिलिंद जोशी या पेक्षा नक्कीच चांगलं लिहितात. ही सर्व व्यक्तीचित्रे या पूर्वी वेगवेगळ्या मासिकांमधून प्रसिद्व झालेली आहेत आणि या पुस्तकात जशीच्या तशी छापली आहेत.

या कारणामुळे काही शब्दप्रयोग वाक्ये आणि संदर्भ यांची पुनरूक्ती झाली आहे. यामुळे देखिल लिखाण विस्कळीत वाटत असेल. या व्यक्तीचित्रांचा पुस्तकात अंतर्भाव करण्यापूर्वी थोडे संपादकीय काम करून सुसूत्रता आणली असली तर वाचकांचा रसभंग झाला नसता.

या प्रसिद्व व्यक्तीमत्वांबद्दल माहिती करून घ्यायची असेल तर जरुर वाचा पण उच्च साहित्यीक मूल्यांची अपेक्षा करू नका.




**श्री. मंदार आपटे.**

# स्वप्न

काही लोकांना खूप स्वप्ने पडतात, काही लोकांना पडलेली स्वप्ने आठवत नाहीत, काही लोकांना असे वाटते, की त्यांना कधीच स्वप्ने पडत नाहीत. स्वप्ने खूप पडोत किंवा कमी पडोत, स्वप्नांबद्दलचे कुतूहल सर्वांनाच असते. स्वप्न पाहणे आणि स्वप्न पडणे या दोन्ही गोष्टी आपल्या आयुष्यातील अविभाज्य भाग असतात. पाहिलेली सर्व स्वप्ने प्रत्यक्षात येणे जसे शक्य नसते, तसे पडलेल्या प्रत्येक स्वप्नाचा अर्थ स्पष्ट होईलच असे नाही

स्वप्न, मग ती दिवसाढवळ्या उघड्या डोळ्यांनी पाहिलेली असोत किंवा रात्री झोपेत पडलेली असोत, आपल्या सर्वांच्या परिचयाची असतात. स्वप्न पडते म्हणजे नेमके काय होते हे याविषयी आधुनिक शास्त्रज्ञांचेही एकमत नाही.

**स्वप्न म्हणजे काय?**

आयुर्वेदात स्वप्न म्हणजे नेमके काय हे पुढील शब्दांत सांगितलेले आहे,

व्यक्ती जागी असताना तिच्या इंद्रियांकरवी मनावर जे निरनिराळे संस्कार झालेले असतात, त्यांचा झोपेत येणारा प्रत्यय म्हणजे स्वप्न होय. स्वप्न पडते, तेव्हा झोप गाढ लागलेली नसते. निद्रिस्त अवस्थेत गाढ झोप नसताना व्यक्ती जे अनुभवते, ते म्हणजे स्वप्न, असेही चरकसंहितेत सांगितलेले आहे. स्वप्न पडण्यामागे मनाचा सहभाग असतो. स्वप्न का पडते हे अष्टांगसंग्रहात समजावले आहे, ते असे '

सर्व इंद्रिये आपल्या विषयापासून निवृत्त झाली तरी, जेव्हा मन निवृत्त होत नाही, शांत होत नाही तेव्हा ते नाना प्रकारची स्वप्ने पाहते.

**स्वप्नांच्या सात तऱ्हा**

मन जर दोषांनी युक्त असेल तर पडणारी स्वप्ने भीतिदायक असतात, असेही सांगितलेले आहे. कधी कधी स्वप्नांचा संबंध पूर्वजन्माशी सुद्धा असू शकतो. मन अशांत असले तर स्वप्न पडण्याचे प्रमाण वाढते, हा अनुभव अनेकांचा असेल. स्वप्नाचे एकूण सात प्रकारात वर्गीकरण केलेले आहे.

दृष्ट : पूर्वी पाहिलेल्या गोष्टी स्वप्नात पाहणे.

- श्रुत : पूर्वी ऐकलेल्या गोष्टी स्वप्नात अनुभवणे.
- अनुभूत : जागेपणी अनुभवलेल्या गोष्टी स्वप्नात येणे.
- प्रार्थित : मनाला हव्याहव्याशा वाटणाऱ्या गोष्टी स्वप्नात दिसणे किंवा व्हायला हवे असे वाटणारे स्वप्नात घडणे.
- कल्पित : जे कधी पाहिले नाही, कधी ऐकले नाही, केवळ मनाने ज्याची कल्पना केली असेल ते स्वप्नात येणे हे कल्पित स्वप्न.
- भावी : वरील सर्व प्रकारच्या स्वप्नांपेक्षा हा प्रकार वेगळाच असतो. यात पूर्वी कधीही न पाहिलेल्या, न ऐकलेल्या किंवा न इच्छिलेल्या घटना स्वप्नात दिसतात आणि पुढे कालांतराने त्या प्रत्यक्षात घडल्याचे प्रत्यंतर येते.
- दोषज : शरीरात वातपित्तकफापैकी जो कोणता दोष वाढेल, त्या दोषाच्या गुणानुरूप स्वप्न पडणे. उदा. वातदोष वाढलेला असल्यास उडण्याचे स्वप्न पडते, पित्तदोष वाढलेला असल्यास रंगीबेरंगी चित्रे, अग्नी वगैरे गोष्टी दिसतात वगैरे. या सात प्रकारांपैकी पहिल्या पाच प्रकारची स्वप्ने निष्फळ असतात. भावी स्वप्ने खरी ठरणारी असतात, तसेच दोषज स्वप्नेसुद्धा दोषसूचक असतात.

**सौ.सारिका जयखेडकर**

# एक वृक्ष प्रेमी व्यक्ती

नवऱ्याच्या कामानिमित्त बृनईत राहण्याची संधी मिळाली. बृनईत प्रवेश करताच आपल्याला कोकणची आठवण आल्या खेरीज राहत नाही.बृनई हे आशिया खंडातील तीन सर्वात लहान देशांपैकी एक देश आहे. बृनई हे पूर्वी मलेशियात सामावलेले होते म्हणूनच आजही मुळ लोकांना मलेशियन म्हणून ओळखले जाते.आजही बृनईची भाषा, संस्कती मलेशियनच आहे. परंतु एकूण लोकसंख्येत चिनी लोकांनचे वास्तव्य अधिक आहे. त्यामुळे बृनईत राहत असताना चिनी संस्कृतीचे दर्शन ही घडते. बृनई हा देश विषुवृत्तावर असल्या कारणाने बाराही महीने इथे पावसाळा असतो. आजही तिथे जुन्या पद्धतीने बांधलेली लाकडी घरे दिसतात, जी जमीनी पासून थोडया उंचावर आहेत. जून्या पद्धतीच्या घरांपेक्षा आता नवीन पद्धतीचे बंगले अधिक प्रमाणात दिसतात. प्रत्येक बंगल्या भोवती चारही बाजूने भरपूर जागा त्या जागेत भरपूर झाडे निरनिराळया फळांची, फूलांची. त्या झाडांनी घरांचे सौंदर्य अजूनच खूलून येत असे.

आम्ही ज्या बंगल्यात राहत होतो तो एका चिनी सद्‌गृहस्थाचा होता, त्याचे नाव जिमी वय वर्ष ६५. रंग गोरापान पण त्या सोबत लाल रंगाची छटा चेहऱ्यावर दिसत असे. वयोमानामुळे चेहऱ्यावर जाणवणाऱ्या सुरकुत्या. केसांची ठेवण अगदी बारिक. देह थोडा रूंद , चिनी लोकांना अपवाद असावा असा. चेहऱ्याचे हावभाव अगदी कोकणची आठवण करून देत असे. चेहऱ्यावर फारसे प्रेमळ भाव कधी नसे. त्यामूळे मी नेहमी जिमीची तुलना कोकणातल्या नारळ, फणसाशी करत असे. कारण काही काळाने थोडी ओळख झाल्यावर त्याच्या मनातल्या गोडव्याची ओळख आम्हाला पटली. हा जिमी त्याच्या संपूर्ण कुटुंबा सोबत आमच्याच शेजारच्याच बंगल्यात राहत होता. आम्ही बृनईत स्थालांतर केल्यानंतर साधारण एकमहीन्याने चिनी नवीन वर्ष होते. या नवीन वर्षाच्या निमित्ताने जिमीने आम्हाला त्याच्या घरी बोलावले. घरात प्रवेश करताच जाणवत होते की फार वर्ष झाली बृनईत या कुटुंबाचे वास्तव्य आहे. नंतर त्याच्याशी बोलताना कळले की तो लग्नाआधीच बृनईत आला आणि एका चिनी मुलीशी लग्न करून इथेच स्थायीकझाला. सध्या तो त्याच्या दोन मुले, दोन सुना आणि दोन नातवंडान सोबत राहत आहे.

सर्व कुटुंबियांशी ओळख करून झाल्यावर त्याने घरातली एकलाकडी खुर्ची दाखवली आणि सांगितल की, ही खुर्ची साधारण ४० वर्ष जुनी खुर्ची आहे. आम्ही सारे आश्चर्याने त्या खुर्ची कडे बघू लागलो आणि आमच्या चेहऱ्यावर असलेला प्रश्नार्थक भाव जिमीने ओळखला आणि मोठयाने हसला. त्यानंतर तो सांगू लागला, एक छोटस रोपट जगवायच पुढे त्याचे मोठया झाडात रूपांतर होणार तेच झाड जूने झाले की त्याच्या फांदया तोडून लाकडे बनवायची. याच प्रक्रियेला साधारण १५ वर्ष निघून जातात. त्यानंतर या खुर्ची सारखी अनेक लाकडी वस्तू बनवले जातात. या खुर्चीला बनवून आता २५ वर्ष झाले आहेत. म्हणजे या लाकडाचा जन्म ४० (१५+२५) वर्षा पूर्वीच झाला आहे. त्याच्या या गणिताने तर आम्ही भारावूनच गेलो. लाकडा सारख्या साध्या वस्तू वर इतका खोल विचार करावा आणि ती लाकडी खुर्ची इतकी वर्ष जपून ठेवावी. आम्हाला खरच त्याचे कौतुक वाटत होते. त्या खुर्ची प्रमाणेच घरातले सगळे सामान फार जून्या पद्धतीचे पण अजूनही चांगल्या अवस्थेत होते.

नवीन घरात आता आम्ही स्थीरावलो होतो. घराच्या आजूबाजूचा परिसर न्याहळत असताना आम्ही पाहिले, आमच्या घराच्या मागे एक मोठी पत्र्याची शेड बांधलेली होती आणि त्यात या जिमीचे सर्व सुतार कामाचे अवजार ठेवलेले होते. सुतार काम हा त्याचा व्यवसाय नसून त्याने जोपासलेला छंद होता.त्याचा हा सुतार कामाचा पसारा पाहून आम्ही एके दिवशी त्याला सांगितले, आम्हाला देव ठेवण्यासाठी एकदेवघर बनवून हवे आहे. जे इथे बृनईत विकत मिळणे अशक्यच आहे तर तुम्ही आम्हाला ते बनवून.दयाल का? यावर त्याने होकार दिल्यावर देवघर कसे बनवून हवे आहे ते आम्ही त्याला समजावून सांगितले. साधारण १५ दिवसात त्याने देवघर बनवून आम्हाला दिले शिवाय मोबदला घेण्यास नकार दिला

यावरून त्याची देवावर असणारी त्याची श्रद्धा आणि सर्व जाती धर्माच्या देवांकडे एकाच नजरेने बघणारी त्याची नजर आम्हाला दिसली.त्यानंतर बऱ्याचदा हा जिमी आमच्या कुटुंबीयांना भेट देत असे. अश्याच एका भेटीत त्याने आम्हाला एक किस्सा सांगितला. आम्ही राहत असलेल्या बंगल्यासमोर एक सुबकआणि टुमदार बंगला होता.त्या घरमालकाने त्याच्या घरातले जूने झालेले आणि मोडकळीस आलेले एक लाकडी कपाट घराबाहेर टाकून देण्याकरिता ठेवले होते. बरेच दिवस कपाट बाहेर ठेवलेले आहे हे पाहून जिमीने ते कपाट त्या घरमालकाकडून मागून घेतले. जिमीने ते कपाट जिमीच्याच घरात कामाला असणाऱ्या गडीच्या मदतीने उचलून आणले आणि घरामागच्या शेड मध्ये आणून ठेवले.त्या कपाटाची चांगली डागडूजी केली आणि मजबूतही केले. काही दिवसांनी छान तयार झालेले कपाट त्याने परत त्या समोर असलेल्या बंगल्याच्या दाराशी नेऊन ठेवले. ते कपाट जिमीने घरात असलेल्या त्या घर मालकाला परत केले आणि सांगितले अरे या कपाटाच वय साधारण २५ वर्ष तरी असेलच. मोडकळीस आले म्हणून असे टाकून देऊ नये. त्यालाही या जिमीचा हेवा वाटला असावा. त्याने आंनदाने त्या कपाटाचा स्वीकार केला आणि धन्यवाद मानले.

आमच्या घराभोवती पाच ते सहा जातीची साधारण पंधरा एकआंब्याची झाडे होती. सुरवातीला या झाडांची आंबे तोडायला आम्ही संकोच करायचो.पण जिमीने बऱ्याचदा आम्हाला आंबे घरपोच आणून दिले शिवाय त्या आंब्यान विषयी चांगली माहिती देखील देत असे. त्याचे नाव, तो कुठल्या भागातला आंबा आहे वगैरे. नंतर आम्ही जिमीची परवांगी घेऊन बिनधास्तपणे आंबे तोडायचो.त्याच दरम्यान बृनईत आमची एक मैत्रिण भारतात सुट्टी घालवून परत बृनईत आली होती. तिने चार हापूस आंबे आम्हाला दिले त्यातलेच दोन आम्ही जिमीला दिले आणि सांगितले हा भारतातला सर्वात उत्कृष्ट आणि चविष्ट आंबा आहे. दोन तीन आठवडयांनी एकआंब्याचे रोपटे आम्हाला आमच्या घराजवळ दिसले. त्याचवेळी जिमी तिथे आला आणि सांगू लागला. तुम्ही दिलेल्या आंब्याचे हे रोपटे आहे. मला वेगवेगळया जातीच्या आब्यांची झाडे लावायला आवडतात. भारतातला सार्वात उत्कृष्ट आंबा माझ्या दारात वाढेल याचे मला नेहमी कौतुक राहिल.

झाडांनचे अस्तीव नसतानाही त्यापासून बनवलेल्या लाकडी वस्तूंवर देखील तसेच प्रेम करणारी व्यक्ती, मी मात्र पहिल्यांदाच पाहीली.



**सौ. रचना गाडगे.**

# संस्कार

‘ढवळया शेजारी पोवळा बांधला, वाण नाही आला पण गुण आला’. ही म्हण मी लहानपणासुन ऐकत आले. त्यावेळेस कदाचित मला या म्हणीचा अर्थ निटसा उमगला नव्हता पण जसजसे वय वाढत गेले तसतसे कालांतराने मला हया म्हणीचा अर्थ पटत गेला. व.पु.काळे,पु.ल.देशपांडे,आचार्य अत्रे वगैरे वगैरे अशा अनेक दिगग्ज्यांनी आपले अनुभव, त्यातुन त्यांना अवगत झालेले ज्ञानामृत आपल्या लेखणी च्या द्वारे पाजले. अर्थात त्यांचे साहित्य वाचताना आपल्याला मनोमन पटते.एवढेच काय पण आजही आपण कुतुहलाने त्यांचे साहित्य वारंवार वाचत असतो.त्यांच्या शब्दातुन बऱ्याचदा फेसबुक ,व्हॉटस अप द्वारे आपल्या परिचितांना टोले मारतो उपदेश करतो.

अररे हे काय? नाही हा मुळीच नाही, मी स्वतःला त्यांच्या बरोबरीला बसवत नाही हो. पण एकुण काय तर माझा सांगायचा हाच प्रयत्न आहे की प्रत्येकाला पावलापावलावर अनुभव येत असतात. नि त्यातुनच प्रत्येकजण शिकत असतो आज ‘बहर’ च्या निमित्ताने का होईना आमच्या सारख्यांना आमचे विचार आमच्या लेखनी द्वारे वाचकां पर्यंत पोहचवायची संधी आपल्याला मंडळाने उपलब्ध करून दिली. हो हा प्रश्न वेगळा की ‘बहर’ असे किती जण वाचतात? वाचकांना विनंती कराविशी वाटते निदान टाईमपास म्हणुन तरी आमचे लेख एकदा तरी नजरेखालून काढावेत.

आजकाल मुलं जन्माला यायच्या अगोदर मातेच्या गर्भात असतानाच त्याला संस्कार दिले जातात अर्थात गर्भ संस्कार केले जातात, काही जण सांगतात की अमुकअमुक पुस्तके वाचा,वीर कथा वाचा.चांगली दृश्ये म्हणजेच देवादिकांची चित्रे डोळयांसमोर ठेवा.अमुकअमुक जप करा,व्रत करा. अर्थात माझ्या मुलांच्या वेळेसही मला असे अनेक उपदेशांचे डोस पाजले गेले होते.गंमत म्हणुन सांगाविशी वाटते.मलाही माझ्या मुलाच्या जन्माआधी कोणीतरी ‘मृत्युंजय’ कादंबरी वाचावयास सांगितली म्हणुन चक्क मी ती विकत घेतली नि वाचु लागले, अर्धी वाचुनही झालेली नि अचानक एकेदिवशी माझी काकु आमच्या घरी आली नि तिने माझ्या हाातातली कादंबरी खेचुन घेतली नि म्हणाली “अग हे असले काही वाचु नकोस,त्या कर्णाला म्हणे शेवटपर्यत आईचे सुख मिळाले नाही,काळाने त्याला त्याच्या आपल्या लोकांनपासुन वंचित केले तुझ्या गर्भावर त्याचे संस्कार व्हायला नकोत.’ पण मी कसली ऐकतेय..मी ही तिला उत्तर देउन बसले “अग काकू निदान माझं मुल कर्णा सारखी कवच कुंडल तरी घेऊन जन्माला येईल. असो तर ‘संस्कार’ म्हणजे तुम्हाला काय वाटतं? संस्कार का आपण गर्भावर केले तरच होतील?

आपण बऱ्याचदा म्हणतो की अरे! असे कसे झले? त्या मुलाने असे केले? ? त्या मुलीने असे दिवे लावले? आई–वडिल तर कीती चांगले आहेत मग मुलं का अशी निघाली?पडला ना प्रश्न तुम्हालाही. चांगल्या संस्कारीत घरातील मुले कशी वाया जातात? कित्येक लहान मुलांमध्ये ही आपण अॅटीटयुड, तिरस्काराची भावना,सुडबुद्धी पाहतो. कोठुन आली ही? कोठे गेला त्यांचा बालिशपणा? मुलं जशी मोठी मोठी होऊ लागतात तशी आपापल्या आजुबाजुला होणाऱ्या घडामोडीतूनच त्यांच्यावर पावलोपावली संस्कार होत असतात. बऱ्याचदा आपण पालकच याला जवाबदार असतो. समाजात वावरताना बरेच लोक पैसा,घमेंड, इगो,स्टेटस,यांचे प्रदर्शन करीत फिरतात. पण कित्येकदा त्यांच्या मनाला हा विचार ही शिवत नाही की या सर्व गोष्टींचा आपल्या मुलांवरही परिणाम होत आहे. आमच्या लहानपणीचा काळ वेगळा होता माणुसकी धर्म पैशा पेक्षा ही मोठा समजला जात होता.शाळेतही खुप चांगल्या चांगल्या शिकवणी दिल्या जात होत्या..

मुलांचे फाजील लाड न करता, मुले चुकलीच तर त्यांना जागच्याजागी डाफरले जायचे, मुलांच्या चुका दाखून दिल्या जायच्या. त्यांना थोर-मोठ्यांच्या, शूर-वीरांच्या गोष्टी ऐकवल्या जायच्या. थोरांबद्दल आदर करायला शिकवले जायचे. शिक्षणाचे महत्व पटून दिले जायचे, चांगल्या वाईट संगतीच्ये परिणाम दाखवले जायचे. पण काळ बदलला नि माणसे आपले खरे चेहरे लपवून मुखवटे घालून वावरू लागली. एकमेकांशी स्पर्धा करू लागली. आजकाल बायकांमध्ये गोसिपिंग वाढू लागले ते फोन वर करत असताना त्यांच्या लक्षातही येत नाही की जवळच आपली मुल ते सार काही ऐकत आहेत . कधी विचार केला का नकळत पणे आपण आपल्या मुलांच्या मनावर चुकीच्या गोष्टींचा परिणाम करून देत आहोत.

जरा स्पष्टच बोलावेसे वाटते. आपण आपला देश सोडून या परराष्ट्रात राहतो इथे आपल्या मुलांवर संस्कार करायला आपणच असतो मुलांचे फालतू लाड करयचे, मैत्रिणीने तिच्या मुलाला ट्याब दिला मग मी माझ्या मुलाला का नाही दयायचा ?आमक्या आमक्याचा मुलगा महागडया शाळेत जातो तर चल मी ही माझ्या मुलाला ह्या शाळेतून काढून महागडया शाळेत घालणार. आम्क्याची मुलगी डांस क्लासला जाते, तर मी हे नाही बघणार माझ्या मुलीला आवड आहे की नाही तर मिही तिला तिच्या मनाविरुद्ध डांस क्लासला पाठवणार. तो मुलगा कराटेला जातो मग माझा मुलगा का नाही ? तर आशाप्रकारे स्पर्धा लागलेली आपल्याला दिसून येते. बऱ्याचदा आपल्याला सवड मिळावी म्हणून आपण मुलांच्या हातात कॉम्पूटर, वर कोणती साईट ओपन करून बसलाय ? ह्या सगळ्या गोष्टी किती शुल्लक वाटतात ना पण यांच्या परिणामांचा विचार केलाय कधी ?

मुलांना चुकले तरी ओरडायचे नाही, ते काय करतील ते करू द्यायचे, मागतील ते त्यांना द्यायचे. इथे सगळेच सुखवस्तू आहेत, प्रत्येक जण याच आविर्भावात आसतो की मी मोठा, मी माझ्या मुलांना काही कमी पडू देत नाही. मग मुलेच ती, गैरफायदा घेणारच. परवाचीच गोष्ट सांगते मी एका पार्टीला गेले तिथे माझी मुलगी चुकीचे वागली म्हणून मी त्याच जागी तिला ओरडले तर काही लेडीज मी काही तरी मोठा गुन्हा केलाय अशा नजरेने माझ्याकडे पाहू लागल्या.अर्थात त्यांच्यात गोसिपिंग झाले की काय हे ? मुलांना असे ओरडतात का ? शी काय बाई आहे ही? आई आहे नाही, हिला समजत नाही मुलांशी कसे वागायचे ते?

अशाने मुलांचा अपमान होतो ना ? आजकालच्या मुलांना नाही सहन होत हे. अरे पण मी म्हणते मुलांच्या मनात ही भावना कोणी रुजवली ? तुम्ही आम्हीच ना ? याचा अर्थ आपण मुलांना काय चांगले ? काय वाईट ? हे ही सांगू नये ? मग त्यांना त्यातली तफावत कशी समजणार ? बरे घरी जाऊन ओरडले तर मुलांच्या नि आप्याही मनातल्या चुकीच्या गोष्टीचे गांभिर्य देखील मावळून गेलेले

असते म्हणजे कसे तर बोट आता कापले नि औषध चार तासांनी लावले तोवर जे काय रक्त वाहते आहे ते वाहून द्यायचे, याला काय अर्थ आहे का ?

कळत न कळत का होईना आपण आपल्या मुलांना अगदी सहजतेने सारकाही उपलब्ध करून देतो, मग त्यामुलांना त्या गोष्टीचे महत्व राहील तरी कसे ? आजही बरीच कुटुंबे इथे वर्षानुवर्षे राहत आहेत,त्यांच्या घरात आजही मुलांवर चांगले संस्कार व्हावे म्हणून बऱ्याच गोष्टी जपल्या जात आहेत त्यांची काळजी घेतली जात आहे. खरे आहे आपल्या मुलांचे लाड करावे पण ते फाजील नसावेत. आपल्या दिनचर्येतल्या, आजुबाजुच्या लहान सहान शुल्लक गोष्टी देखील आपल्या मुलांवर संस्कार करीत असतात. आपणच चांगल वागलो तर नक्कीच आपली मुलेही त्याच संस्कारात वाढतील.

अर्थात करता करविता तो परमेश्वर आपण त्याच्यापेक्षा मोठे नक्कीच नाही आहोत. आपल्या मुलांना आध्यात्माच्या चार गोष्टी वेळात वेळ काढून जरूर सांगा कारण ती काळाची गरज आहे. पैशानी श्रीमंत होण्यापेक्षा चांगल्या संस्कारांनी त्यांना श्रीमंत होऊ दया. शिक्षणाचे महत्व त्यांना कळू दया कारण ह्या चुकीच्या धावपळीत मुलांचे शिक्षणाकडे दुर्लक्ष झालेलेच दिसून येते.

थोर मोठ्यांनी सांगितलेच आहे " सरस्वतीची पूजा केल्यास ' लक्ष्मी ' आपणहून जवळ येते.




सौ. सुषमा पाटील

// श्री गणेशाय नम//

# घे भरारी !

सकाळी 'मोका',दुपारी झोपा

संध्याकाळच्या गप्पा, रात्रीचा ठेका.

ऑफिसात पाटया,कट्टयावर चकाटया

कुकरच्या शिटया अन थंडीच्या शेकोटया.

चौकोनी पटाला जा उल्लंघून

स्वच्छंद गगनात मुक्त विहारी

घे भरारी !!

तोंडदेखलं हास्य,फुकट चौकशा

खोटी कौतुके बेकार चर्चा.

मेणचट चेहरे, विचकट नाच

ठिगळट गाणी, कुजकट गोष्टी.

सपक वाटेची झटकून जळमटं

दे जगण्याला नवी खुमारी

घे भरारी !!

आंधळया ओव्या, नेभळट शिव्या

पोकळ कणव, बोथट जाणीवा.

विलासी नशा,भंपक तोरा

मिजासी पारा, लंपट नजरा.

झुगारून दे करूनी त्वरा

वैगुण हे प्राणांतिक विखारी

घे भरारी !!

ठरवलली हार, हरवलेली जिद्द

मिरवलेला हुद्दा, गिरवलेला कित्ता.

कोती वर्तुळे, छोटी क्षितिजे

उसनी निष्ठा, तोकडी पराकाष्ठा.

सामान्यतेची पाश तोडुनी

जागो दिव्यत्वाची आस उरी

घे भरारी ! !

**श्री. अनिरुद्ध गोखले**

# गुंतवणुकीचा ग म भ न

नमस्कार मंडळी,

माझ्या सर्व मराठी मित्र जनांना माझा नमस्कार आणि येणाऱ्या चांगल्या दिवसांसाठी मनापासुन शुभेच्छा मागील काही दिवसांमध्ये आपण सर्वांना एक परिर्वतन, एक लोकशाही,क्रांती अनुभवली आणि परत एकदा 'परिवर्तन हा सृष्टीचा नियम आहे' हे वैश्विक सत्य मान्य केले.

हया सर्व राजकीय सामजिक परिवर्तनात एक अजुन परिवर्तनाने माझे लक्ष वेधले. हे परिवर्तन आहे आपल्या भारतीय गुंतवणुकीच्या मानसिक बातमी अशी होती कि आजपर्यंत भारतीय गुंतवणुकीत ६० टक्क्यांन पेक्षा जास्त रक्कम बँकामधील ठेवींमध्ये असायची ती आता रिअल इस्टर आणि सोने याकडे वळली आहे. याचा अर्थ आपण आपली मुल्यवान गुंतवनुक अशा क्षेत्रामध्ये करतोय ज्यात आपले पैसे ज्यास्त काळासाठी अडकुन राहु शकते. सर्व सामान्य माणसांना हयात काही आक्षेपही किंवा एवढे विस्मयजनक काय आहे हा प्रश्न पडणे स्वाभाविक आहे.

हयासाठी आपण महेशचे उदाहरण पाहु. महेश वय वर्षे ३५ एका मल्टीनॅशनल इंजिनीयरिंग कंपनीत चांगल्या हुदयावर. घरात दोन मुले, बायको व आई वडील. श्रीमंत वर्गात मोडणारे घर.चांगल्या काळामध्ये गुंतवणुक म्हणुन त्याने दुसरे घर घेतले किंबहुना बँकेने देखील पगार पाहुन दुसरे होमलोन मंजुर केले. हया घरापासुन त्याला एक चांगली रक्कम घरभाडे म्हणुन मिळत होती.एकंदरीत सर्व चांगले चालले होते. पण काही कारणांमुळे कंपनीला नवीन प्रोजेक्टर मिळणे बंद झाले. मग त्या अनुषंगाने येणारे निर्बंध (इंक्रीमेंट,बोनस कपात वगैरे.)बसु लागले.मिळणाऱ्या घरभाडयातून घरखर्च निघेल अशी परिस्थिती असताना बाकीच्या भविष्यातील खर्चांची तरतुद म्हणुन महेशने नाईलाजस्तव एक निर्णय घेतला आणि मिळालेल्या पहिल्या ऑफरवर पर्याय नसल्याने परदेशी एका दुर्गम भागात काही काळ एक्टयाने राहुन नोकरी करण्याचा निर्णय घेतला. ह्या उलट त्याच कंपनीतल्या सागरची परिस्थिती साधरण महेशसारखीच पण सागरने घाई नकरता प्रत्येक ऑफरवर नीट विचार करून स्वतःसोबत आपल्या कुटुंबाला आनंदात राहता येईल अशा ठिकाणी नोकरी घेतली.

ह्यात सागरची परिस्थिती चांगली होती कारण एकच होते .सागरने आपल्या भविष्यातील येणाऱ्या प्रत्येक चढउताराचा अंदाज घेऊन आपली आर्थिक उदिदष्टे व आर्थिक लक्ष्य ठरले होते. फक्त रिअल इस्टेट मध्ये जास्त प्रमाणात गुंतवणुक करण्यापेक्षा त्याने इतर सर्व क्षेत्रांमध्ये उदः (..) सांगितल्या प्रमाणे गुंतवणुक केली होती.तसेच त्याने आपत्कालिन काळासठी अशा प्रकारे गुंतवणुक केली होती कि हवी तेवढी रक्कम लगेच मिळु शकेल .वरिल दोन्ही उदाहरणांच्या अनुषंगाने मला एक गुंतवणुक तज्ञ आणि आर्थिक नियोजनकर म्हणुन काही मुदयांवर प्रकाश टाकावासा वाटतो.

१) रिअल इस्टेट हे श्रेत्र जरी जास्त परतावा (रिटर्न)देणार असेल तरी ती दीर्घ काळासाठीक करावयाची गुंतवणुक आहे.तसेच ती जास्त महागडी (कर्जाचे व्याजदर,देखभाल खर्च इ.)आहे.सर्वात महत्त्वाची जोखीम म्हणजे आपल्याला हवी तेव्हा आणि पाहिजे तेवढी रक्कम यातुन उपलब्ध होईल याची शास्वती नाही.हया खेरीज इतर अनेक बाबी आहेत त्याचा विचार पुढील लेखात करू.

२) गुंतवणुकीचे गुरू श्री वॉरेन बफे म्हणतात त्याप्रमाणे गुंतवणुक हि सर्व क्षेत्रा मध्ये विभागुन करावी खरेतर हे परदेशी माणसाने सांगण्याआधी आपल्या आजी –अजोबांनी पणजोबांनी आचरणात आणले होते.त्या काळी लोक काशीयात्रे साठीची रक्कम,घरखर्चची रक्कम व आजारपणासाठीची रक्कम वेगवेगळया भांडयात ठेवत असत हेच सुत्र आजही आपण वेगळया पद्वतीने आचरणात आणू शकतो.

३) सर्वात महत्त्वाची व प्राधान्यांने विचार करण्यासाठी गोष्ट हि की आपल्या आर्थिक गरजा,आर्थिक लक्ष्य हि आपण आपल्या स्वतःच्या आणि कुटूंबाच्या काही बाबींचा विचार करून ठरवाव्यात.शक्यतो यासाठी आर्थिक नियोजनकाराच सल्ला घ्यावा.

आता चांगला आर्थिक नियोजनकार कसा निवडावा हा एक स्वतंत्र लेखाचा विषय आहे.त्यावर नंतर काधीतरी बोलु. तुर्त आपण एवढेच ध्यानात ठेवले पाहिजे कि आपल्या स्वकष्टार्जीत कमाईतून आपल्याला सम्पत्तीचे नवनिर्माण करायचे असेल तर त्यासाठी योग्य तेवढा वेळ व विचारविर्मश करणे आवश्यक आहे.

**सौ. चित्रा टक्ले..**

# नविन सभासदांची ओळख

नमस्कार मंडळी,

'महाराष्ट्र मंडळ अबुधाबी' च्या परिवाराचा विस्तार होण्यामागे नवीन सदस्यांनी केलेल्या नोंदणीचा महत्वाचा वाटा नेहमीच राहिला आहे. २०१४-१५ या कार्यकारिणी वर्षाच्या सुरवातीला श्री. सत्यनारायण पूजेच्या दिवशी नवीन सदस्यांनी नोंदणी करून, ते पुन्हा एकदा सिद्ध केले आहे.

'महाराष्ट्र मंडळ अबुधाबी' तर्फे आपण या नवीन सदस्यांचे आपल्या परिवारात आनंदाने स्वागत करुया.

| नाव | दूरध्वनी क्र. | कार्यालय | अबुधाबी वास्तव्य | भारत वास्तव्य |
|---|---|---|---|---|
| श्री. पवन मेहता | ०५५-४७९९७९९ | Dhabi Group | हमदान स्ट्रीट | ठाणे |
| श्री. रवींद्र गावडे<br>सौ. रुपाली गावडे | ०५५-५८६७३००<br>०५५-५४७६८०० | Mott. MacDonald | लिवा स्ट्रीट | ठाणे |
| श्री. आश्विन घाडगे<br>सौ. सुवर्णा घाडगे | ०५०- ३१०७३९०<br>०५६- ७१३८५३० | Technip Intercity | नाझदा स्ट्रीट | पवई |
| श्री.रामानुजन जेउघाले<br>सौ. सरिता जेउघाले | ०५०-७११२५४९<br>०५६-२७८९७४७ | ADMA-OPCO | हमदान स्ट्रीट | पुणे |
| श्री. धीरज झोपे<br>सौ. स्मिता झोपे | ०५५-८६८३९२५<br>०५६-९८०६५८१ | ADCO | खालीदिया | डोंबिवली |
| श्री. आशिष भोले<br>सौ. स्वाती भोले | ०५६-७२५३४५१<br>०५०-८७४६३७९ | Mott. MacDonald | मुरूर रोड | भांडूप |
| श्री. सारंग मोलकर<br>सौ. वृषाली मोलकर | ०५५ -९००४४२२ | Al Sabbah Electro Mechanical | मुरूर रोड | नागपूर |
| श्री. सुनील सावंत<br>सौ. समीक्षा सावंत | ०५५-१३६८४९७<br>०५२ -८०६९२८२ | ADCO | खलिफा स्ट्रीट | कांदिवली |
| श्री. अतुल काळे<br>सौ. अपूर्वा काळे | ०५० -६५४८९२९<br>०५० -३६१८७२० | Schlumberger | मादिनात झायेद | पुणे |
| श्री. प्रणव कुलकर्णी<br>सौ. वृषाली कुलकर्णी | ०५६ -६७७०९७५<br>०५०-८१२४००७ | Larsen & Toubro LTD. | इलेक्ट्रा स्ट्रीट | नाशिक |
| श्री. जयेश मालवणकर<br>सौ.शीतल | ०५२ -९०८५७६२<br>०५० -६१६२२९५ | Etihad Airways | नाझदा स्ट्रीट | मीरा रोड |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मालवणकर | | | | |
| श्री. विनायक लिमकर<br>सौ. दीपाली लिमकर | ०५० -९४४५९४७<br>०५५ -९५९१३१२ | GASCO | हमदान स्ट्रीट | बरोडा |
| श्री. रवींद्र देसाई<br>सौ. गौरी देसाई | ०५० -२८९९६८५<br>०५६ -१००४३८२ | GASCO | खालीदिया | कराड |
| श्री. अमित शेंद्रे<br>सौ. पद्मजा शेंद्रे | ०५६ -१७४४०८७<br>०५५ -३०३७१२० | ICR Integrity Gulf | इलेक्ट्रा स्ट्रीट | बोरीवली |
| श्री. भावेश संगोई<br>सौ. मिल्की संगोई | ०५६ -९४९४५६९<br>०५६ -७२९७६२९ | Technip | हमदान स्ट्रीट | मालाड |
| सौ. सारिका दरेकर | ०५५-१६४३५४१ | Technical Parts Est | एअरपोट रोड | मुलुंड |
| श्री. मनोज जोशी | ०५०-८७९००९८ | Mott. MacDonald | हमदान स्ट्रीट | नांदेड |
| श्री. मंजुल टकले<br>सौ. चित्रा टकले | ०५६-६१४०७०५<br>०५०-८१७८८२४ | Technip | इलेक्ट्रा स्ट्रीट | ठाणे |
| श्री. प्रवीण भोईर | ०५६-३३२३९४७ | Technip | टुरिस्ट क्लब | ठाणे |
| श्री. संदीप बांदल<br>सौ. सीमा बांदल | ०५५-४४२६३६४<br>०५५-३०४२०७२ | Halliburton | इलेक्ट्रा स्ट्रीट | ठाणे |
| श्री. सागर देवधर<br>सौ. अमृता देवधर | ०५६-६८५०२३५<br>०५६-७३६०९१३ | V'Monitor | इलेक्ट्रा स्ट्रीट | दादर |
| श्री. विक्रांत वखारे<br>सौ. सुजाता वखारे | ०५५-६१०२७६२<br>०५०-५७९७२८५ | ADDC | हमदान स्ट्रीट | बदलापूर |
| श्री. अमोल जोशी<br>सौ. अमृता जोशी | ०५५-७०००४८८<br>०५५-३१२७८४२ | Mubadala | मुरूर रोड | पुणे |
| श्री. अक्षय फणसे | ०५०-५६६७१४० | JLA International Engineering LLC | खालीदिया | पुणे |

धन्यवाद,

महाराष्ट्र मंडळ अबुधाबी कार्यकारी समिती २०१४-१५












**<u>पाक्कला स्पर्धेतील विजेते:</u>**

शाकाहारी विभाग : पहिला क्रमांक – सौ.शीतल झळकिकर    दुसरा क्रमांक: सौ.प्रज्ञा खरोटे

मांसाहारी विभाग : पहिला क्रमांक – सौ. धनश्री राजे    दुसरा क्रमांक: सौ.सुजाता पाटील.

मिष्टान्न विभाग : पहिला क्रमांक – सौ. रेश्मा वेद    दुसरा क्रमांक: सौ. आरती कस्तुरे

मुले विभाग : पहिला क्रमांक – कु. इशिता पांडे    दुसरा क्रमांक: कु..साची गुरव

**<u>साथ तुझी माझी विजेते</u>**

पहिला क्रमांक: श्री.व सौ.उज्जैनकर

दुसरा क्रमांक: श्री. व सौ. वेद